कै. स्वातंत्र सैनिक पांडू मास्तर उर्फ पांडुरंग गोविंद पाटील यांचे स्मारक मौजे येडेनिपाणी ता.वाळवा, जि.सांगली येथील स्मारकाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्मारक-२०१६/प्र.क्र.२००/पंरा-९**
सार्वजनिक बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक:- ११ जानेवारी, २०१७

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.३११३/प्र.क्र.३०८/२६, दि.२१ ऑगस्ट, २०१३.
२) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय, क्र.२०१६/प्र.क्र.३/पंरा-९, दि.११ ऑगस्ट, २०१६.

प्रस्तावना:-

जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली यांचे दिनांक ७ नोव्हेंबर, २०१६ च्या पत्रान्वये कै.स्वातंत्र सैनिक पांडू मास्तर ऊर्फ पांडुरंग गोविंद पाटील यांचे मौजे येडेनिपाणी, ता.वाळवा, जि.सांगली येथे स्मारक बांधकामासाठी रु.२,२५,४२,७९५/- लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पंचवीस लाख बेचाळीस हजार सातशे पंच्यान्नव फक्त) इतक्या किमंतीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेकरिता सादर केला होता.

सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमती करिता सादर केला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रस्ताव तपासून रुपये २,२५,४२,७९५/- लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पंचवीस लाख बेचाळीस हजार सातशे पंच्यान्नव फक्त) इतक्या प्रकल्प किंमत व अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:--

कै. स्वातंत्र सैनिक पांडु मास्तर ऊर्फ पांडुरंग गोविंद पाटील यांचे मौजे येडेनिपाणी, ता.वाळवा, जि.सांगली येथील स्मारक बांधकामाच्या रुपये २,२५,४२,७९५/- लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पंचवीस लाख बेचाळीस हजार सातशे पंच्यान्नव फक्त) इतक्या रक्कमेच्या आराखडे व अंदाजपत्रकांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर स्मारकाच्या बांधकामाच्या आराखडयास सार्वजनिक बांधकाम विभागाने खालील प्रमाणे सूचना दिलेल्या आहेत.

अ) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र.९६/इमा-३, दि८/७/२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
ब) काम सुरु करणेपूर्वी जागेची खात्री करावी.
क) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे मुख्य अभियंता व उपभोक्त्या विभागाचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.
ड) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास व पुतळयास शासकीय वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. ग्राम विकास व जलसंधाण विभाग शासन निर्णय क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६ मधील परिच्छेद-३ (३) अन्वये शासकीय निधीतून शासकीय जागेवर स्मारक उभारण्यात यावे अशी स्पष्ट तरतूद आहे. तथापि, कै.स्वातंत्र सैनिक पांडु मास्तर ऊर्फ पांडुरंग गोविंद पाटील यांचे स्मारक बांधकाम सुरु करण्यापूर्वी स्मारकाची जागा शासनाच्या किंवा जिल्हा परिषद यांच्या नावे हस्तांतरित करुन घेण्यात यावी. या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर खर्च हा लेखाशिर्ष-मागणी क्रमांक-एल-३, २०१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९६ जिल्हा परिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभरण्याकरिता अनुदान (२५१५२४८६), ३१ सहायक अनुदान (योजनांतर्गत) या लेखाशिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उपरोक्त निधीतून खर्च करण्याकरिता कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली (सांकेतांक क्रमांक २४०१००५१६०) यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी स्मारकाच्या कामाची प्रगती तसेच निधी उपयोगिता संबंधिची माहिती, उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर कावी व महालेखापालांच्या लेख्याशी खर्च मेळाबाबतची कार्यवाही करावी.

७. सदर स्मारकाच्या बांधकामावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी स्मारक समितीची राहील.

८. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन, अनुक्रमांक-४ नियम-२७ (२) अन्वये, अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी पर्यंतच्य प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकारी प्रशासकीय विभागास आहेत. यानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

९. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२५/१६/इमा-३, दिनांक ३०/११/२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळाव उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०१७०११११७२५१८३५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2017.01.11 17:28:45 +05'30'

**(मनोज जाधव)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.पालकमंत्री, सांगली जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. विभागीय आयुक्त पुणे.
८. जिल्हाधिकारी, सांगली
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१२. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा) मुंबई.
१३. सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, सांगली.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली.
१५. कक्ष अधिकारी, का-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन अधिकारी (इमा-१ व इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन पंरा-९ संग्रहार्थ.